**इयत्ता १० वी व १२ वी च्या परीक्षेत विशेष उल्लेखनीय यश मिळविणा-या अनुसूचित जाती , विजाभज व विशेष मागास प्रवर्गाच्या मुलामुलींना राजर्षी छत्रपती <u>शाहू महाराज गुणवत्ता पुरस्कार प्रदान करणे</u>**

## महाराष्ट्र शासन

सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक -इबीसी-२००३/प्र.क्र.११५/मावक २
मंत्रालय विस्तार भवन,मुंबई-४०० ०३२.

**दिनांक ११ जून , २००३**

**<u>प्रस्तावना</u> -** माध्यमिक व उच्च माध्यमिक मंडळाच्या दहावी व बारावीच्या परीक्षेत सर्वसाधारण विद्यार्थ्यांमधून प्रथम येणा-या अनुसूचित जाती, विजाभज व विशेष मागास प्रवर्गाच्या विदयार्थ्यांना विशेष पुरस्कार देवून त्यांचा गौरव करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**<u>शासन निर्णय</u> -** याबाबत साकल्याने विचार करुन माध्यमिक व उच्च माध्यमिक मंडळाच्या इयत्ता १० वी व इयत्ता १२ वी च्या परीक्षेमध्ये सर्वसाधारण विद्यार्थ्यांमधून प्रथम येणा-या अनुसूचित जाती, विजाभज व विशेष मागास प्रवर्गाच्या विद्यार्थ्यांना खालीलप्रमाणे राजर्षी छत्रपती शाहू महाराज गुणवत्ता पुरस्कार सन २००३-०४ या शैक्षणिक वर्षापासून देण्यास शासन पुढीलप्रमाणे मान्यता देत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | सर्वसाधारण विद्यार्थ्यांमधून राज्यात प्रथम आलेल्या अनुसूचित जाती, विजाभज व विशेष मागास प्रवर्गाच्या विद्यार्थ्यास (म्हणजे जर संपूर्ण राज्यातून पहिला आलेला विद्यार्थी अनुसूचित जाती, विजाभज व विशेष मागास प्रवर्गाचा असेल तर) | रु.२.५० लाख रोख, स्मृतिचिन्ह व प्रमाणपत्र |
| २ | सर्वसाधारण विद्यार्थ्यामधून प्रत्येक बोर्डामधून प्रथम आलेल्या अनुसूचित जाती , विजाभज व विशेष मागास प्रवर्गाच्या विद्यार्थ्यांस | रु.१.०० लाख रोख, स्मृतिचिन्ह व प्रमाणपत्र |
| ३ | राज्याच्या गुणवत्ता यादीमध्ये आलेल्या प्रत्येक अनुसूचित जाती, विजाभज व विशेष मागास प्रवर्गाच्या विद्यार्थ्यास | रु.५० हजार रोख , स्मृतिचिन्ह व प्रमाणपत्र |
| ४ | सर्वसाधारण विद्यार्थ्यांमधून जिल्हयात प्रथम आलेल्या अनुसूचित जाती, विजाभज व विशेष मागास प्रवर्गाच्या विद्यार्थ्यास | रु.२५ हजार रोख , स्मृतिचिन्ह व प्रमाणपत्र |

२. या योजनेस दूरदर्शन व आकाशवाणी व सर्व स्तरावरुन व्यापक प्रसिध्दी देण्यांत यावी. जिल्हा स्तरावर प्रथम येणाऱ्या विद्यार्थ्यास परितोषिक वितरण दिनांक २६ जुलै रोजी संबंधित जिल्हयाचे पालकमंत्री यांच्या हस्ते करण्यांत यावे. तसेच विभागीय बोर्डात सर्वसाधारण विद्यार्थ्यांमधून पहिल्या क्रमांकाने उत्तीर्ण होणाऱ्या अनुसूचित जाती, विजाभज व विशेष मागास प्रवर्गाच्या विद्यार्थ्यांचा ,राज्याच्या गुणवत्ता यादीमध्ये आलेल्या अनुसूचित जाती, विजाभज व विशेष

मागास प्रवर्गाच्या विद्यार्थ्यांचा व सर्वसाधारण विद्यार्थ्यांमधून राज्यात प्रथम येणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी राज्यस्तरावर परितोषिक वितरण समारंभ दिनांक २६ जुलै रोजी आयोजित करण्यात यावा.

३. तसेच सदरहू विद्यार्थ्यांना पुरस्कार देण्यासाठी आयोजित करावयाच्या समारंभासाठी रु.५.०० लाख इतक्या खर्चास मंजूरी देण्यात येत असून, सदर खर्च करण्यास संचालक, समाज कल्याण ,महाराष्ट्र राज्य , पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर योजनेच्या तरतूदीतून प्रसिध्दी, समारंभ व इतर खर्च करण्यास शासन मंजूरी देत आहे. तसेच या योजनेच्या प्रसिध्दी व समारंभाबाबत खर्च करण्याचे अधिकार संचालक, समाज कल्याण यांना देण्यात येत आहेत.

४. या बाबीवर होणारा खर्च हा " मागणी क्रमांक एन - ४ -२२२५ अनू. जाती, अनु. जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण, ०१ अनूसूचित जातीचे कल्याण, २७७ शिक्षण, शिष्यवृत्ती व विद्यावेतने, पंचवार्षिक योजनातंर्गत योजना, राज्य योजनातंर्गत योजना ( विघयो )(०४) (१८) राजश्री शाहू महाराज गुणवत्ता पुरस्कार (२२२५-३२६-२) ४० शिष्यवृत्त्या / विद्यावेतने " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून प्रतिवर्षी करण्यात येणा-या मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

५. सन २००३-०४ या वर्षाकरिता येणारा खर्च वरील परिच्छेद २ मध्ये नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

६. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारित संदर्भ क्रमांक ४२१/०३/व्यय-१४, दिनांक २८/४/२००३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

**( नं. मा.शिलवंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति
मा. राज्यपालांचे सचिव,
मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव,
मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव
सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
त्यांना विनंती करण्यात येते की, उपरोक्त शासन निर्णयाच्या अनुषंगाने आवश्यक त्या सूचना आपण आपल्या अधिनस्त असलेल्या सर्व माध्यमिक व उच्च माध्यमिक परीक्षा मंडळांना दयाव्यात.
संचालक, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
वित्त विभाग (व्यय १४) मंत्रालय, मुंबई
संचालक, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
चेअरमन,माध्यमिक व उच्च माध्यमिक परिक्षा मंडळ, पुणे.
चेअरमन,विभागीय माध्यमिक व उच्च माध्यमिक परिक्षा मंडळ, पुणे /कोल्हापूर /मुंबई/ नाशिक/ औरंगाबाद / लातूर/अमरावती/नागपूर.
उपसंचालक, शिक्षण - सर्व विभाग.

सर्व विभागीय समाज कल्याण अधिकारी/सर्व विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी

त्यांना कळविण्यात येते की, माध्यमिक व उच्च माध्यमिक परीक्षा मंडळाची विभागीय कार्यालये ज्या ठिकाणी आहेत त्यांच्याशी माध्यमिक व उच्च माध्यमिक परीक्षांचे निकाल लागल्यानंतर त्वरीत संपर्क साधून त्यांच्याकडून त्या विभागाच्या अखत्यारीत असलेल्या सर्व जिल्हयांची उपरोक्त शासन निर्णयात नमूद केलेली माहिती प्राप्त करुन घेवून ती संबंधित जिल्हयांना पाठवावी.

सर्व समाज कल्याण अधिकारी, गट - अ, जिल्हा परिषद/सर्व शिक्षणाधिकारी (उच्च माध्यमिक )

महालेखापाल, महाराष्ट्र - १/२ ( लेखा परीक्षा, लेखा अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर

अधिदान व लेखाधिकारी, मुंबई

सर्व कोषागार अधिकारी, मुंबई

निवड नस्ती मावक - २

**परिशिष्ट -अ**

**शासन निर्णय क्रमांक.इबीसी-२००३/प्र.क्र.११५/मावक २,दिनांक ११ जून, २००३ चे सहपत्र**

**इयत्ता १० वी च्या परीक्षेत विशेष उल्लेखनीय यश मिळविणा-या अनुसूचित जाती, विजाभज व विशेष मागास प्रवर्गाच्या मुलामुलींना राजश्री छत्रपती शाहू महाराज गुणवत्ता पुरस्कार प्रदान करणे.**

**अंदाजीत खर्चाचा तपशिल**

**(रुपये लाखात)**

| | | |
|---|---|---|
| १ | सर्वसाधारण विद्यार्थ्यांमधून राज्यात प्रथम आलेल्या अनुसूचित जाती, विजाभज व विशेष मागास प्रवर्गाच्या मुलामुलींना. | २.५० |
| २ | सर्वसाधारण विद्यार्थ्यांमधून प्रत्येक बोर्डात प्रथम आलेल्या अनुसूचित जाती, विजाभज व विशेष मागास प्रवर्गाच्या मुलामुलींना. (रु.१.०० x ८ = ८.०० ) | ८.०० |
| 3 | सर्वसाधारण विद्यार्थ्यांमधून राज्याच्या गुणवत्ता यादीत आलेल्या प्रत्येक अनुसूचित जाती, विजाभज व विशेष मागास प्रवर्गाच्या मुलामुलींना. (रु.०.५० x अंदाजे १० = ५.०० ) | ५.०० |
| ४ | सर्वसाधारण विद्यार्थ्यांमधून जिल्हयात प्रथम आलेल्या अनुसूचित जाती, विजाभज व विशेष मागास प्रवर्गाच्या मुलामुलींना.(रु.०.२५ x ३५ = ८.७५ ) | ८.७५ |
| ५ | उपरोक्त गौरवप्राप्त विद्यार्थ्यांना स्मृतीचिन्ह देणे. (विदयार्थी ५४ x रु.०.०३ = १.६२ ) | १.६२ |
| ६ | **समारंभ आयोजनासाठी** . | |
| | • राज्य स्तर | ५.०० |
| ७ | दूरदर्शन / आकाशवाणीवर समारंभाची प्रसिध्दी देणे. | १.०० |
| | **एकूण** | **३१.८७** |

उपरोक्त अनु.क्र.५,६ व ७ या बाबींवर योजनेच्या तरतूदी मधून खर्च करण्यास मंजूरी देण्यांत येत आहे. तसेच सदर तरतूदीतून कमी/जास्त खर्च करण्याचे अधिकार संचालक समाज कल्याण यांना राहतील.

सदरहू पारितोषिक वितरण दिनांक २६ जुलै रोजी न झाल्यास संबंधित विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी यांना जबाबदार धरुन त्यांचेवर कारवाई प्रस्तावित करण्यांत येईल.

****

**परिशिष्ट -ब**

**शासन निर्णय क्रमांक .इबीसी२००३/प्र.क्र.११५/मावक २,दिनांक ११ जून , २००३ चे सहपत्र**

**इयत्ता १२ वी च्या परीक्षेत विशेष उल्लेखनीय यश मिळविणा-या अनुसूचित जाती, विजाभज व विशेष मागास प्रवर्गाच्या मुलामुलींना राजर्षी छत्रपती शाहू महाराज गुणवत्ता पुरस्कार प्रदान करणे.**

**अंदाजीत खर्चाचा तपशिल**

**(रुपये लाखात)**

| | | |
|---|---|---|
| १ | सर्वसाधारण विद्यार्थ्यांमधून राज्यात प्रथम आलेल्या अनुसूचित जाती, विजाभज व विशेष मागास प्रवर्गाच्या मुलामुलींना | २.५० |
| २ | सर्वसाधारण विद्यार्थ्यांमधून प्रत्येक बोर्डात प्रथम आलेल्या अनुसूचित जाती, विजाभज व विशेष मागास प्रवर्गाच्या मुलामुलींना. (रु.१.०० x ८ = ८.०० ) | ८.०० |
| ३ | सर्वसाधारण विद्यार्थ्यांमधून राज्याच्या गुणवत्ता यादीत आलेल्या प्रत्येक अनुसूचित जाती, विजाभज व विशेष मागास प्रवर्गाच्या मुलामुलींना.(रु.०.५० x अंदाजे १० = ५.०० ) | ५.०० |
| ४ | सर्वसाधारण विद्यार्थ्यांमधून जिल्हयात प्रथम आलेल्या अनुसूचित जाती, विजाभज व विशेष मागास प्रवर्गाच्या मुलामुलींना. (रु.०.२५ x ३५ = ८.७५ ) | ८.७५ |
| ५ | उपरोक्त गौरवप्राप्त विद्यार्थ्यांना स्मृतीचिन्ह देणे. (विदयार्थी ५४ x रु.०.०३ = १.६२ ) | १.६२ |
| ६ | समारंभ आयोजनासाठी . | |
| | • राज्य स्तर | ५.०० |
| ७ | दूरदर्शन / आकाशवाणीवर समारंभाची प्रसिध्दी देणे. | १.०० |
| | **एकूण** | **३१.८७** |

उपरोक्त अनु.क्र.५,६ व ७ या बाबींवर योजनेच्या तरतूदी मधून खर्च करण्यास मंजूरी देण्यांत येत आहे. तसेच सदर तरतूदीतून कमी/जास्त खर्च करण्याचे अधिकार संचालक समाज कल्याण यांना राहतील.

सदरहू पारितोषिक वितरण दिनांक २६ जुलै रोजी न झाल्यास संबंधित विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी यांना जबाबदार धरुन त्यांचेवर कारवाई प्रस्तावित करण्यांत येईल.

****